सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील
अधिकारी व जवान यांच्या विधवा/अवलंबितांना
तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी/जवानांना
आर्थिक मदत देण्याबाबत.

*महाराष्ट्र शासन*
*सामान्य प्रशासन विभाग*
शासन निर्णय, क्रमांक:मासैम-२०१०/(प्र.क्र.१६९/२०१०)/२८
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १०.०६.२०१०.

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम-१०९९/१६६१/प्र.क्रे.१२६/९९/२८ दि. ४ऑक्टोबर२०००
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण-२००२/प्र.क्र.५०/२००२/२८,दि.२३ मार्च,२००३.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैक-२००२/९३३/प्र.क्र.८६/२००२/२८, दि.९ डिसेंबर,२००३

शासन निर्णय:-

संदर्भाधीन अ.क्र.(१) येथील शासन निर्णयाद्वारे जम्मू-काश्मिर मधील नियंत्रण रेषेजवळील क्षेत्रात तसेच देशातंर्गत भागात मे, १९९९ पासून निर्माण झालेल्या युध्दजन्य तणावाच्या परिस्थितीत चकमकीत/मोहिमेअंतर्गत धारातीर्थी पडलेल्या सैन्यदलातील महाराष्ट्र राज्यातील सैनिकांच्या विधवांना/अवलंबितांना प्रत्येकी रुपये ५.०० लाख प्रमाणे एकवेळची आर्थिक मदत देण्याबाबत त्याचप्रमाणे गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व आलेल्यांना त्यांच्या अपंगत्वाच्या प्रमाणाुसार रु.१.०० व रु.३.०० लाख आर्थिक मदत देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या आर्थिक मदतीपैकी संदर्भाधीन अ.क्र.(१) व (३) येथील शासन निर्णय दि.४.१०.२००० व दि.०९.१२.२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे द्यावयाच्या आर्थिक मदतीपैकी ४०% रक्कम शासकीय अनुदानातून व उर्वरित ६०% रक्कम मुख्यमंत्री सहाय्यता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रु.२२.२२ कोटी इतक्या रक्कमेच्या व्याजातून देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार संदर्भाधीन शासन निर्णयांनुसार युध्दात/ चकमकीत धारातीर्थी पडलेले जवानाच्या अवलंबितांना तसेच गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेले जवानानां आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देत आहे.

अ) धारातीर्थी पडलेला जवान (रुपये ५ लाख प्रमाणे एक वेळची आर्थिक मदत) -

| अ. क्र | नाव | मृत्यू दिनांक /मोहिम | वारसाचे नाव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | कै. रंगलाल टिकाराम रोडके, ००११४१८४५, १७२ बी.एस.एफ.बटालीयन, कॉन्स्टेबल. | ०५.०६.२००७ ऑपरेशन ड्यूटी, नाका पॉइंट नं.१, बी.ओ.पी., एलएनपूर, (पश्चिम बंगाल) | १.श्रीमती प्रतिभा रंगलाल रोडके (वीरपत्नी) - रु.३.०० लाख, २.सौ. सुमित्रा टिकाराम रोडके, (वीरमाता) - रु.१.०० लाख, ३.श्री.टिकाराम संपत रोडके (वीरपिता) - रु.१.०० लाख मु.काटी, पो.हरदोली, ता.मोहाडी, जि.भंडारा |

ब) गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेले जवान -

| अ. क्र | नाव व पत्ता | मोहिम, दिनांक व अपंगत्वाचे प्रमाण | दिनांक ४.१०.२००० च्या शासन निर्णयानुसार अनुज्ञेय रक्कम |
|---|---|---|---|
| १. | शिपाई अमोल भगवानसा बोरीवाले,<br>नं. १०४३८१४७ एल,<br>११६ इन्फैन्ट्री बटालयीन (टी.ए.) पॅरा पॅराप्लेजीक रिहॅबीलेशन सेंटर, पार्क राड,<br>खडकी, पुणे-२०. | ०१.१२.२००६<br>ऑपरेशन रक्षक<br>(जम्मू-काश्मिर)<br>१०० टक्के | रुपये ३.०० लाख |
| २. | गनर (जी.डी.) विलास हरी भोगम,<br>नं.१५१५४५०५ एल,<br>२९ राष्ट्रीय रायफल्स (६७ फिल्ड रेजिमेंट)<br>मु.पो.कडवे, ता.शाहुवाडी, जि.कोल्हापूर. | ०७.११.२००७<br>कॉऊंटर इन्सरजेन्सी ऑपरेशन<br>(जम्मू-काश्मिर)<br>३० टक्के | रुपये १.०० लाख |
| ३. | नायक बाळकृष्ण यशवंत राऊळ,<br>नं.२७८०९४८ एफ,<br>१२ मराठा लाईट ईन्फैन्ट्री,<br>मु.पो.वेर्ले (फौजदारवाडी), ता.सावंतवाडी,<br>जि.सिंधुदूर्ग. | २२.०५.१९९९<br>ऑपरेशन रक्षक<br>(जम्मू-काश्मिर)<br>३० टक्के | रुपये १.०० लाख |
| ४. | हवलदार राजू दौलत खंडागळे,<br>नं.२७८९२६२ एफ,<br>२१ पॅरा (स्पेशल फोर्स)<br>मु.पो.रायपूर, ता.जि.बुलडाणा. | ०२.०७.१९९९<br>ऑपरेशन विजय<br>(जम्मू-काश्मिर)<br>२० टक्के | रुपये १.०० लाख |
| ५. | शिपाई अनिल रंगनाथ लामखडे,<br>नं.२८००५७७एन,<br>४ मराठा लाईट ईन्फैन्ट्री,<br>मु.पो.राळेगण थेरपाळ, ता.पारनेर,<br>जि.अहमदनगर. | ०६.०१.२००८<br>ऑपरेशन रक्षक<br>(जम्मू-काश्मिर)<br>१०० टक्के | रुपये ३.०० लाख |

२. वरील परिच्छेद क्र.(१) मधील धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या अवलंबितांना तसेच गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेले जवानाना द्यावयाची आर्थिक मदत रु.१४,००,०००/- (रुपये चौदा लाख फक्त) इतक्या रक्कमेपैकी ४०% रक्कम रु.५,६०,०००/- (रुपये पाच लाख साठ हजार फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरीत ६०% रक्कम रु.८,४०,०००/- (रुपये आठ लाख चाळीस हजार फक्त) मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रु.२२.२२ कोटी रक्कमेच्या व्याजातून द्यावयाची आहे.

३. उपरोक्त परिच्छेद क्र.(२) मधील प्रयोजनार्थ होणारा रु.५,६०,०००/- (रुपये पाच लाख साठ हजार फक्त) इतका खर्च मागणी क्र.ए-५ लेखाशीर्ष " २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२-सामाजिक सुरक्षा योजने खाली निवृत्तीवेतन - (००)(०४) देशांतर्गत सुरक्षासंबंधी मोहिमेत/चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सैन्यातील जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक

मदत (२२३५-२६०-८) ५०-इतर खर्च" याखाली सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या अवलंबितांना तसेच गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेले जवानाना द्यावयाची आर्थिक मदत संबंधित जिल्हयांच्या पालक मंत्र्यांच्या हस्ते देण्यात यावी.

४. याबाबत संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संबधित पुरस्कारार्थ्यांना सदरहू रक्कम लाभार्थ्यांची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व तत्सबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००६१०१३४७१९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
( अ. द. जोशी)
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (मासैक),
मा.राज्यमंत्री (मासैक),
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई, (शाखा -ड-५/ड-६) २० प्रती)
महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा व आुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर,
कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई - ४०० ००५,
जिल्हाधिकारी, भंडारा, पुणे, कोल्हापूर, सिंधुदुर्ग, बुलडाणा, अहमदनगर,
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, भंडारा, पूणे, कोल्हापूर, सिंधुदूर्ग, बुलडाणा, अहमदनगर,
संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे - ४११००६, (५ प्रती)
जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, भंडारा, पूणे, कोल्हापूर, सिंधुदूर्ग, बुलडाणा, अहमदनगर,
सह संचालक, लेखा व कोषागार,संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,मुंबई - ३२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-४,) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
सामान्य प्रशासन विभाग/कार्या-२५,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती (२ प्रती).